**अतिरिक्त सरकारी अभियोक्ता,गट-अ सवंर्गातील अभियोक्त्यांना सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता, गट-अ या पदावर पदोन्नती देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांक : डीपीपी-२०१०/११८५/प्र.क्र.२५८/पोल-१०**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२, दिनांकः २१ मे,२०११**

**वाचा** : संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्रमांक : असपदो/१०८/२३९/ २०११, दिनांक ३.०२.२०११ चे पत्र.

## आदेश

संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या नियंत्रणाखालील अतिरिक्त सरकारी अभियोक्ता, गट-अ या संवर्गातील खाली नमूद केलेल्या अधिका-यांना त्यांच्या नावासमोर नमूद केलेल्या ठिकाणी सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता, गट-अ या संवर्गातील रु.१५६००-३९१०० ग्रेड पे रु.६९००/- या वेतनश्रेणीतील पदावर प्रशासकीय हितास्तव व तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नतीने नियुक्त्या देण्यात येत आहेत.

| अ.क्र. | अभियोक्त्याचे नांव | सध्या कार्यरत असलेले ठिकाण | मान्य झालेला विभागीय सवंर्ग | पदोन्नतीनंतरचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.विजय पुरुषोत्तम देशमुख | औरंगाबाद | औरंगाबाद | जालना |
| २ | श्री.चंद्रकांत गोपाल कुलकर्णी | पुणे | नागपूर | चंद्रपूर |
| ३ | श्री.अशोक शंकर कोर | ठाणे | अमरावती | अकोला |
| ४ | श्री.प्रकाश श्रीधरराव देशमुख | यवतमाळ | अमरावती | यवतमाळ |
| ५ | श्री.तानाजी हरी जाधव | पुणे | कोकण | रत्नागिरी |
| ६ | श्री.भानुदास देवीदास देशपांडे | मुंबई | औरंगाबाद | लातूर |
| ७ | श्री.काशिनाथ वामन दिघे | मुंबई | कोकण | सिंधुदुर्ग |
| ८ | श्री.हेमंत बापूराव जाधव | रायगड | नागपूर | गडचिरोली |
| ९ | श्री. संजय माणिकराव पवार | पुणे | अमरावती | वाशिम |
| १० | श्री.सर्वदमन प्रतापराव राजे-निबांळकर | मुंबई | औरंगाबाद | औरंगाबाद |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ११ | श्री.राजीव रामराव थोरात | ठाणे | नागपूर | वर्धा |
| १२ | श्री.पुंडलीकराव नारायण गारुळे | नागपूर | नागपूर | गोंदिया |
| १३ | श्री.रामचंद्र एस.चरके | नागपूर | औरंगाबाद | बीड |

२. वरील अधिका-यांना देण्यात आलेली पदोन्नती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) वरील अधिका-यांना देण्यात आलेली पदोन्नती ही तात्पुरत्या स्वरुपाची असून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

ब) पदोन्नत झालेल्या अधिका-यांनी त्यांच्या पदोन्नतीचे आदेश प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून सात दिवसांच्या आत हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे ते विहित मुदतीत नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत तर त्यांना पदोन्नती नको, असे समजून शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०८७/११३१/प्र.क्र.११/८९/१२, दिनांक ३०.०४.१९९१ मधील तरतुदीनुसार त्यांना देण्यात आलेली पदोन्नती रद्द करण्यात येईल.

क) संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी पदोन्नत झालेल्या वरील अधिका-यांना स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत संबंधीतांना सूचना द्याव्यात. तसेच संबंधीत कर्मचा-यांनी पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

ड) पदोन्नत अधिका-यांनी त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे व त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जाऊ नये, यासंदर्भात त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक सीडीआर -१०८२/२५६७/२८/११, दिनांक ३०.०८.१९८२ अन्वये दिलेल्या सूचनांकडे वेधण्यात येत आहे. तसेच नवीन नियुक्ती रद्द करण्यासाठी कोणत्याही स्वरुपाचे आवेदन त्यांनी करु नये. तसे केल्यास सदर अधिकारी शिस्तभंगाच्या कार्यवाहीस पात्र ठरतील, याची संबंधीतांनी नोंद घ्यावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०११०५२११६०४००००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( वि.वि.दपके )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई
२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
३) सामान्य प्रशासन विभाग,(कार्यासन-१२), मंत्रालय,मुंबई-३२
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
५) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
६) मा.मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
७) प्रधान सचिव (अ.व सु.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, कोकण/औरंगाबाद/अमरावती/नागपूर
१०) संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी
११) सर्व सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता (संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या मार्फत )
१२) संबंधीत अतिरिक्त सरकारी अभियोक्ता (संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या मार्फत )
१३) निवड नस्ती (पोल-१०)